जलसंपदा विभागातील उप विभागीय अभियंता यांची कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नतीने पदस्थापना.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एसएलएस-१११३/(३९७/२०१३)/भाग-२/आ.(वर्ग-१)..(१)**
गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल, नवीन मंत्रालय,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
**तारीख: १० नोव्हेंबर, २०१४**

## शासन आदेश

जलसंपदा विभागातील उप विभागीय अभियंता संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावर रुपये १५६००-३९१०० (ग्रेड पे रु.६६००) या सुधारित वेतनश्रेणीमध्ये उप विभागीय अभियंता संवर्गाच्या नियमित कोट्यातून परंतु निव्वळ तात्पुरत्या व तदर्थ (Ad-hoc), स्वरुपात महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून पदोन्नती देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उप विभागीय अभियंत्यांचे नाव (सर्वश्री) व जात प्रवर्ग | सध्याचे कार्यालय | कार्यकारी अभियंता (स्थापत्य) पदावर पदोन्नतीने पदस्थापनेचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १. | राजपाल कचरुजी वाणे (अ.जा.) | अ.अ., यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ अंतर्गत | कार्यकारी अभियंता व पदसिध्द अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई | रिक्त पदी. |
| २. | अनिलकुमार परशरामजी सोनेवार (विमाप्र) | अ.अ., यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ अंतर्गत | कार्यकारी अभियंता, उजनी धरण व्यवस्थापन विभाग, भीमानगर, जि.सोलापूर | रिक्त पदी. |
| ३. | पंडित दिगंबरराव सानप (भ.ज.ड) | अ.अ., औरंगाबाद पाटबंधारे मंडळ, औरंगाबाद अंतर्गत | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद | रिक्त पदी. |
| ४. | संजयकुमार व्यंकटराव पडलवार (अ.ज.) | अ.अ., लघु सिंचन (जलसंधारण) मंडळ, औरंगाबाद अंतर्गत | कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नांदेड | रिक्त पदी. |

२. सदर पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेल्या रिट पिटीशन क्र.३९७१/२०१०, क्र.४२८४/२०१० सिव्हील ॲप्लीकेशन क्र.९१६०/२०१०, अवमान याचिका क्र.२३८४५/२०१२ व २०९/२०१४ तसेच, मॅट, औरंगाबाद येथे दाखल मूळ अर्ज क्र.५३१/२०१४ च्या अंतिम निर्णयाधीन राहील.

३. वरील अधिकाऱ्यांची पदोन्नती ही उप विभागीय अभियंता संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतेच्या व त्यामध्ये होणाऱ्या बदलांच्या अधीन राहील व या पदोन्नतीमुळे वरील अधिकाऱ्यास सदर पदोन्नतीच्या दिनांकापासून ज्येष्ठतेचा हक्क मागता येणार नाही.

४. सदर अधिकाऱ्यांस विभागीय संवर्ग वाटप नियमावलीनुसार महसूली विभागाचे वाटप करण्यात आलेले आहे.

५. सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती ५०/५५ व्या वर्षाच्या पुनर्विलोकनाच्या निर्णयाच्या अधीन राहील.

६. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांस कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीने पदस्थापनेचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून १ महिन्याच्या आत नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-१०८७/११३१/प्र.क्र.११/८९/बारा, दि.३०.०४.१९९१ मधील तरतूदीनुसार आवश्यक कार्यवाही करण्यात येईल.

७. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांनी पदग्रहण केल्यापासून १ महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प न दिल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली, १९८१ मधील नियम क्र.११(१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन, त्यांची वेतन निश्चिती करण्यात यावी.

८. संबंधीत नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, पदोन्नत झालेल्या उप विभागीय अभियंत्यांना पदोन्नतीच्या नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी त्वरीत कार्यमुक्त करावे. तसेच, पदोन्नत अधिकाऱ्यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नियुक्तीच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत अवगत करावे.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१४१११०१७२१२२२२२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajshekhar C Patil

Digitally signed by Rajshekhar C Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rajshekhar C Patil
Date: 2014.11.10 18:39:25 +05'30'

**(रा.चं.पाटील)**
शासनाचे अवर सचिव

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.

२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.

३. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्विय सहायक.
४. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व महासंचालक / कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
९. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
१०. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई / नागपूर.
११. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१२. मुख्य अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण), पुणे.
१३. सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
१५. सर्व अधीक्षक अभियंता, लघु सिंचन (जलसंधारण) मंडळ.
१६. संबंधीत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१७. अधिदान व लेखा अधिकारी / संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
१८. अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. कार्यासने दक्षता-१ / २ / ३, गोपनीय शाखा, आ.(वर्ग-२), रोख शाखा, जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई.
२०. आ.(वर्ग-१) संग्रहार्थ.